दिनांक १४ ते २० फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत शिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी, पुणे येथे आयोजित अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०१८-१९ मध्ये महाराष्ट्राचा संघ सहभागी होण्यासाठी होणाऱ्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांक- अभानासे- ३८१९/प्र.क्र.१६/क्रीयुसे-२,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २० फेब्रुवारी, २०१९.

वाचा:- १. केंद्रीय नागरी सेवा, सांस्कृतिक कार्य आणि क्रीडा मंडळ यांचे पत्र क्रमांक- ५९/२/२०१८-१९/सीसीएससीएसबी, दि.१२.१२.२०१८.
२. महासचिव,सचिवालय जिमखान्या यांचे पत्र क्र.- अभानासे/लॉन टेनिस/२०१८-१९, दि.०२.०२.२०१९.
३. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग,मुंबई यांचे पत्र क्रमांक- उपसंक्री/अभानासे/१८-१९/का-४/२९६, दि.०८.०२.२०१९.

शासन निर्णय :-

दि.१४ ते २० फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत शिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी, पुणे येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा, २०१८-१९ मध्ये भाग घेण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा संघ निवडण्याकरिता सचिवालय जिमखाना, मुंबई येथे दि.१४ जानेवारी,२०१९ रोजी निवड चाचणी आयोजित करण्यात आली होती. या चाचणीमध्ये सहभागी झालेल्या अधिकारी व कर्मचा-यांची यादी सोबतच्या विवरणपत्र "क" प्रमाणे तर निवड चाचणीद्वारे निवडण्यात आलेल्या राज्याचा संघ विवरणपत्र "अ" प्रमाणे आहे. सदर स्पर्धेची निवड चाचणी, प्रशिक्षण शिबीर तसेच राज्याचा संघ सहभागी होण्यासाठी विवरणपत्र "ब" प्रमाणे **रु.८२,४२५/-(रुपये ब्याऐंशी हजार चारशे पंचवीस फक्त )** इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. या साठी उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. संघातील ज्या खेळाडूंना किटबॅग्ज व ट्रॅकसूट मिळालेले आहेत ते खेळाडू कोणत्याही अखिल भारतीय नागरी सेवा क्रीडा स्पर्धेसाठी किटबॅग व ट्रॅकसूट दोन वर्षातून एकदा मिळण्यास पात्र ठरतील, या नियमाचे सचिवालय जिमखान्याने काटेकोरपणे पालन करावे.

४. स्पर्धेत सहभागी होण्यासाठी संबंधित विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी खेळाडू प्रशिक्षक/ व्यवस्थापक यांना दि. ११ ते १३ फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत प्रशिक्षण शिबिरासाठी व दि. १४ ते २० फेब्रुवारी,२०१९ या कालावधीत स्पर्धेत सहभागी होण्यासाठी दि. ०८ जानेवारी, २०१९ (म.नं.) पासून कार्यमुक्त करावे व या खेळाडूंच्या सेवा सचिवालय जिमखान्यास उपलब्ध

करून देण्यात याव्यात. संघातील प्रत्येक खेळाडूने व व्यवस्थापकाने ते ज्यांच्या अधिपत्याखाली काम करीत असतील त्या विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांची परवानगी मिळविणे आवश्यक आहे.

५. वित्त विभाग चा शासन निर्णय क्रमांक-एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे,१९८९ वक्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै, १९९२ मधील तरतूदींनुसार संघातील खेळाडू, प्रशिक्षक व व्यवस्थापक यांची दि. ०८ ते २१ फेब्रुवारी,२०१९ (प्रशिक्षण शिबीर,स्पर्धा व प्रवास) या काळातील कार्यालयीन अनुपस्थिती "कर्तव्य कालावधी" म्हणून समजण्यात यावा. या सर्वाचा प्रवासभत्ता, दैनिक भत्ता व इतर भत्ते यावर होणारा खर्च संबंधित विभागाच्या/ कार्यालय प्रमुखांच्या मुख्य लेखाशिर्षाखाली असणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. स्पर्धेच्या निवड चाचणीसाठी उपस्थित अधिकारी/कर्मचारी (विवरणपत्र-क) यांची कार्यालयीन अनुपस्थिती शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै,१९९२ अन्वये कर्तव्यार्थ म्हणून समजण्यात यावी व मुंबईबाहेरील खेळाडूंना अनुज्ञेय असलेला प्रवास/ दैनिक भत्ता व इतर सवलती या वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक -एलव्हीई-१४०४/प्र.क्र.८/अ/सेवा-८, दिनांक २७ फेब्रुवारी, २००४ अन्वये विशेष बाब म्हणून मंजूर करण्यात यावी. या सवलतीचा लाभ मिळण्यासाठी निवड चाचणीसाठी उपस्थिती असणा-या अधिकारी व कर्मचारी यांच्या उपस्थितीबाबत मानद सचिव, सचिवालय जिमखाना यांनी दिलेले प्रमाणपत्र संबंधित कर्मचा-यांनी त्यांच्या आस्थापना कार्यासनात सादर करणे आवश्यक राहिल.

७. सचिवालय जिमखान्याने प्रत्यक्ष खर्चाचे विवरणपत्र कोणत्याही परिस्थितीत आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना स्पर्धेत केलेल्या खर्चाच्या अहवालासोबत सादर करावे. तसेच जर रक्कम शिल्लक राहिली तर ती उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना त्वरीत परत करण्यात यावी.

८. यासाठी होणारा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी “२२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (०६) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा, (०६)(०२) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धेत सहभाग (२२०४ १९८१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

९. सचिवालय जिमखाना यांच्याकडून स्पर्धेचा अहवाल, बाबनिहाय प्रत्यक्ष झालेल्या खर्चाचा तपशील, विनियोग प्रमाणपत्र, परिक्षितलेखा विवरणपत्र व मंजूरी आदेशातील सर्व अटींची पूर्तता करण्याच्या अटीवर विवरणपत्र"ब" प्रमाणे खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२२०१११२१४६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: CN = Rajendra Shankarrao Pawar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports Department
Date: 2019.02.20 11:22:03 +05'30'

**(राजेंद्र पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे विभाग, पुणे
३. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई,
४. जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०२१.
६. महालेखापाल (लेखावअनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
८. वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय,मुंबई.
९. मानद महासचिव,सचिवालय जिमखाना, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती)
१०. संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचे कार्यालये (सचिवालय जिमखान्यामार्फत)
११. निवड नस्ती (क्रीयुसे-२).

## विवरणपत्र “अ”

दिनांक १४ ते २० फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत बालेवाड, पुणे येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०१८-१९ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या लॉन टेनिस संघाचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या स्पर्धकांची नावे दर्शविणारे विवरणपत्र. साठी होणाऱ्या खर्चाचे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूंचे नाव व पदनाम | ट्रॅक सूट/ ब्लेझर | किटबॅग | विभाग / कार्यालय |
|---|---|---|---|---|
| | **पुरुष** | | | |
| १ | श्री. उल्हास फुलझेले, शाखा अभियंता | होय | होय | मृद यांत्रिकी रेफरळ प्रयोगशाळा, मेरी, नाशिक, जिल्हा- नाशिक. |
| २ | श्री. राजाराम शि. देवकर, उपसंपादक | होय | होय | संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई. |
| ३ | श्री. प्रदीप द. जगदाळे उपायुक्त | होय | होय | उपायुक्त राज्यकर, GST भवन, येरवडा, पुणे. |
| ४ | श्री. श्रवण हार्डीकर,आयुक्त | होय | होय | पुणे महानगर पालिका, पुणे. |
| ५ | श्री. संजय पाटील, उप जिल्हाधिकारी | होय | होय | जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा |
| ६ | श्री. किरण सोनवणे प्रादेशिक उपसंचालक | होय | होय | प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग) सोलापूर यांचे कार्यालय,सोलापूर. |
| ७ | श्री. नरेंद्र सोपल, सह संचालक | होय | होय | क्रिडा व युवक सेवा संचालनालय, शिव छत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी, पुणे. |
| | **महिला** | | | |
| ८ | सौ. संध्याराणी ग. बंडगर मुख्य लेखापाल | होय | होय | उपवनसंरक्षक, वन भवन, नेहरु नगर, सोलापूर |
| ९ | श्रीमती सोनाली ज. सोनार मो.वा.नि. | होय | होय | प्रादेशिक परिवहन कार्यालय (मुंबई पूर्व) वडाळा, मुंबई |
| १० | श्री. अमोल शं. वाणी लिपिक टंकलेखक (प्रशिक्षक) | होय | होय | नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ |
| ११ | श्री. मिलिंद पेडणेकर लघुलेखक (व्यवस्थापक) | होय | होय | नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ |

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: CN = Rajendra Shankarrao Pawar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports Department
Date: 2019.02.20 11:22:19 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**विवरणपत्र "ब"**

दिनांक १४ ते २० फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत बालेवाडी, पुणे येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०१८-१९ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या लॉन टेनिस संघासाठी होणाऱ्या खर्चाचे विवरणपत्र.

| क्र. | तपशील | रक्कम |
|---|---|---|
| अ) | **निवड चाचणी** | |
| १ | निवड चाचणीपूर्वीचा खर्च. | ५००/- |
| ब) | **निवड चाचणी आयोजनाचा खर्च.** | |
| १ | प्रमुख पंच यांचे मानधन व प्रवास खर्च. | २,०००/- |
| २ | चार सदस्यांकरिता पुणे येथे जाण्या-येण्यासाठी झालेला खर्च. | २,५००/- |
| ३ | निवड चाचणीस उपस्थित जिमखाना पदाधिकारी/ प्रितिनिधी व पंच यांच्याकरिता चहा/ अल्पोपहारावरील खर्च. (पुणे येथे) | २,५००/- |
| ४ | निवड चाचणीसाठी १ डझन लॉन टेनिस चेंडू. | १,२००/- |
| ५ | प्रथोमोपचार साहित्य. | ५००/- |
| क) | **प्रशिक्षण शिबीर.** | |
| १ | ३ दिवसाच्या प्रशिक्षण शिबीराकरिता खेळाडू, व्यवस्थापक/ प्रशिक्षक यांच्या चहा व अल्पोपहार व जेवणावरील खर्च. (बालेवाडी, पुणे येथे) + १०% G.S.T. | २,०००/- |
| २ | प्रशिक्षकाचे मानधन. | १,५००/- |
| ३ | २ डझन लॉन टेनिस चेंडू. (१२००x२) | २,४००/- |
| ४ | औषधे (रेली स्प्रे) व किरकोळ. | ५००/- |
| ड) | **संघासाठी साहित्य** | |
| १ | २ लॉन टेनिस रॅकेट रु. २,०००/- प्रमाणे. | ४,०००/- |
| इ) | **वैयक्तिक क्रीडा साहित्य होणारा खर्च :-** | |
| १ | १० ब्लेझर रु. ३१००/- प्रमाणे. | ३१,०००/- |
| २ | ११ किटबॅग प्रत्येकी रु. ५००/- प्रमाणे | ५,५००/- |
| ३ | १८ टि शर्टस् रु. ४००/- प्रमाणे. १८ x ४०० | ७,२००/- |
| ४ | १८ शॉटर्स रु. ३००/- प्रमाणे. १८ x ३०० | ५,४००/- |
| ५ | ११ जोडी पायमोजे प्रत्येकी रु. ७५/- प्रमाणे. ११ x ७५ | ८२५/- |
| ६ | ११ बूटांचे जोड प्रत्येकी रु. ८००/- प्रमाणे. ११ x ८०० | ८,८००/- |
| ७ | ९ जोडी निकॅप रु. १००/- प्रमाणे. | ९००/- |
| ८ | ९ रीस्ट बॅण्डरु. १००/- प्रमाणे. | ९००/- |
| ९ | ९ हेड बॅण्ड रु. १००/- प्रमाणे. | ९००/- |
| १० | ९ सपोटर्स रु. १००/- प्रमाणे. | ९००/- |

| | | |
|---|---|---|
| फ) | प्रथमोपचाराकरिता खर्च. | |
| | ग्लुकोज/ औषधे/स्प्रे इत्यादीसाठी खर्च. | ५००/- |
| | **एकूण रुपये :- (रु. ब्याऐंशी हजार चारशे पंचवीस फक्त)** | **८२,४२५/-** |

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: CN = Rajendra Shankarrao Pawar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports Department
Date: 2019.02.20 11:22:34 +05'30'

( राजेंद्र पवार )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**विवरणपत्र - क**

दिनांक १४ ते २० फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत बालेवाड, पुणे येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०१८-१९ मध्ये भाग घेणाऱ्या महाराष्ट्र शासनाच्या लॉन टेनिस संघाची निवड करण्यासाठी दि. २८ जानेवारी, २०१९ रोजी निवड चाचणीसाठी उपस्थित राहिलेले अधिकारी कर्मचारी खेळाडूंची नावे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूंचे नाव व पदनाम | विभाग / कार्यालय |
|---|---|---|
| १ | श्री. नरेंद्र सोपल, सह संचालक | आयुक्त, क्रिडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २ | श्री. प्रकाश आर. सूर्यवंशी, सहा. आयुक्त राज्यकर | आयुक्त, राज्यकर, GST भवन, येरवडा, पुणे. |
| ३ | श्री. प्रभाकर बा. गावडे, प्रकल्प संचालक | जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, पुणे. |
| ४ | श्री. उल्हास फुलझेले, शाखा अभियंता | मृद यांत्रिकी रेफरळ प्रयोगशाळा, मेरी, नाशिक, जिल्हा- नाशिक. |
| ५ | श्री. राजेंद्र गोळे, जिल्हा अधीक्षक | अधीक्षक, भूमी अभिलेख कार्यालय, येरवडा, पुणे. |
| ६ | श्री. संजय पाटील, उप जिल्हाधिकारी | जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा |
| ७ | श्री. राजाराम शि. देवकर, उपसंपादक | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. |
| ८ | श्री. प्रशांत का. मेंगळ, टेनिस बॉय | राज्यपालाचे परिवार प्रबंधक कार्यालय, राजभवन, वाळकेश्वर, मुंबई. |
| ९ | श्री. किरण सोनावणे, प्रादेशिक उपसंचालक | प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग) सोलापूर यांचे कार्यालय, जिल्हाधिकारी कार्यालयाजवळ, सोलापूर. |
| १० | श्री. श्रवण हर्डीकर, आयुक्त | पुणे महानगर पालिका, पुणे. |
| ११ | श्रीमती सोनाली ज. सोनार मो.वा.नि. | प्रादेशिक परिवहन कार्यालय मुंबई (पूर्व),वडाळा ट्रक टर्मिनल, वडाळा, मुंबई. |
| १२ | सौ. संध्याराणी ग. बंडगर, मुख्य लेखापाल | उपवनसंरक्षक, सोलापूर वन विभाग, नेहरु नगर, सोलापूर. |
| १३ | श्री. सुधाकर वि. हूड राज्यकर निरिक्षक | सहा. राज्यकर आयुक्त (प्रशा), प्रशासकीय भवन, सिव्हील लाईन्स, वर्धा. |
| १४ | श्री. पुरुषोत्तम ज्ञा. निकम प्रादेशिक परिवहन अधिकारी | प्रादेशिक परिवहन कार्यालय, वडाळा टर्मिनल, मुंबई. |
| १५ | श्री. प्रदीप द. जगदाळे उपायुक्त | आयुक्त राज्यकर, GST भवन, येरवडा, पुणे. |

| | | |
|---|---|---|
| १६ | श्री. अमोल शं. वाणी,<br>लिपिक- टंकलेखक | नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १७ | श्री. सतीश ना. सोनवाने,<br>सहा. कक्ष अधिकारी | जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १८ | श्री. अनिरुध्द सू. देशपांडे,<br>सहा. कक्ष अधिकारी | सांस्कृतिक व पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई. |

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: CN = Rajendra Shankarrao Pawar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports Department
Date: 2019.02.20 11:22:54 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**